"मुख्यमंत्री माझी लाडकी बहिण योजनेसाठी" सन २०२५-२६ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरण करणेबाबत. (लेखाशिर्ष २२३५डी७६७)

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२५/प्र.क्र.६५/अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- ०५ जून, २०२५

वाचा :- १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०७.०४.२०२५

२) महिला व बाल विकास विभागाची नस्ती क्र. मवबा २०२५/प्र.क्र.८३/का.०२

**शासन निर्णय :-**

"मुख्यमंत्री माझी लाडकी बहिण" योजनेसाठी अनुसूचित जाती घटकांकरिता सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, ७८९ अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०२) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०२) (०१) मुख्यमंत्री माझी लाडकी बहिण योजना (कार्यक्रम) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२३५डी७६७) या लेखाशिर्षाखाली रु.३९६०.०० कोटी इतका नियतव्यय मंजूर आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०७.०४.२०२५ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. त्यानुसार वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार "मुख्यमंत्री माझी लाडकी बहिण" या योजनेमधील पात्र महिला लाभार्थ्यांना माहे मे महिन्याचा आर्थिक लाभ अदा करण्यासाठी (२२३५डी७६७) या लेखाशिर्षाखाली रु.४१०.३० कोटी इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव, महिला व बाल विकास विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व महिला व बाल विकास विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

४. विभागाने अनुसूचित जातीच्या व नवबौध्द प्रवर्गातील महिला लाभार्थी संख्या उपलब्ध करुन देण्यात यावी. तसेच अनुसूचित जाती व नवबौध्द प्रवर्गातील घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीचा विनियोग अनुसूचित जातीच्या व नवबौध्द प्रवर्गातील लाभार्थीकरिताच होईल याबाबत विभागाने दक्षता घ्यावी. सामाजिक न्याय विभाग व विशेष सहाय्य विभागाच्या सजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावण बाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना अंतर्गत राज्यातील पात्र लाभार्थी महिलाना "मुख्यमंत्री माझी लाडकी बहिण" या योजनेव्दारे दुस-यांदा आर्थिक अनुदान मिळणार नाही याबाबत महिला व बाल विकास विभागाने दक्षता घ्यावी.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.७.४.२०२५ च्या परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.७.४.२०२४ च्या परिपत्रकान्वये निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.५६०/२०२५/व्यय-१४, दि.२०.५.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६०५१०४५०१२७२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

DIPALI M SHAHARE

Digitally signed by DIPALI M SHAHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=d04eb42b12fb47e33c7eeb7688422942f312490bb2c05f193239c86b90923ebc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5B8DDD9A6616B549721333288CDD011356BBC07CC98BAD29D1250DD98073BDB3, cn=DIPALI M SHAHARE
Date: 2025.06.05 10:46:17 +05'30'

**( दिपाली शाहारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
४) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग